यवतमाळ जिल्ह्याचा मानव विकास अहवालाच्या छपाईकरिता विदर्भ विकास मंडळास निधी उपलब्ध करून देणेबाबत...

# महाराष्ट्र शासन

## नियोजन विभाग

**शासन आदेश क्रमांक: विविमं २०१३/प्र.क्र.१३९/का.१४१६,**

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

दिनांक : १० ऑक्टोबर, २०१८

**संदर्भ:** १. नियोजन विभागाचे आदेश क्रमांक: विविमं-२०१३/प्र.क्र.१३९/१४१६, दिनांक ११ सप्टेंबर, २०१४.

२. अपर आयुक्त तथा सदस्य सचिव, विदर्भ विकास मंडळ, नागपूर यांचे पत्र क्र. विविमं/जि.वि.अ./संस-२/२०१८/१६४, दिनांक १३ जुलै, २०१८

**शासन आदेश:**

मा. राज्यपाल यांनी दिलेल्या निदेशांनुसार, मानव विकास निर्देशांक कमी असलेल्या जिल्ह्यांचा (यवतमाळ व गडचिरोली) जिल्हा विकास अहवाल तयार करण्याकरिता नियोजन विभागाच्या दिनांक ११ सप्टेंबर, २०१४ रोजीच्या आदेशान्वये मान्यता प्रदान करण्यात आली असून रू.३४,१५,०००/- (रू. चौतीस लक्ष पंधरा हजार फक्त) इतका निधी विदर्भ विकास मंडळास उपलब्ध करून देण्यात आला आहे.

२. अपर आयुक्त तथा सदस्य सचिव, विदर्भ विकास मंडळ यांनी संदर्भ क्र. २ येथील पत्रान्वये केलेल्या विनंतीनुसार यवतमाळ जिल्ह्याचा मानव विकास अहवालाच्या २०० प्रतींच्या छपाईकरिता रू.८०,०००/- (रू. ऐंशी हजार फक्त) इतका निधी सदर शासन आदेशान्वये उपलब्ध करून देण्यात येत आहे.

३. सदर खर्च "मागणी क्रमांक ओ-१०, ४५१५- इतर ग्रामविकास कार्यक्रमावरील भांडवली खर्च, (००) (०२) वैधानिक विकास मंडळांचा क्षेत्रांतर्गत विकास कार्यक्रम, ५३- मोठी बांधकामे (४५१५ ००३९) (कार्यक्रम)" या लेखाशीर्षाखाली, सन २०१८-१९ या वर्षातील अर्थसंकल्पित तरतूदीतून भागविण्यात यावा.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१८१०१०१५५८१७२८१६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Maya Roop Vasudeo

Digitally signed by Maya Roop Vasudeo
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Planning Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=6feaef8191e4a5cf83f3409f76214c1bbb386df214f40eb3db528e6ea18a3bb1, serialNumber=60b30444f3b7ad81b2f32912506b69de2a01b84759943289c5b29755e4712c40, cn=Maya Roop Vasudeo
Date: 2018.10.10 16:02:22 +05'30'

**( मा.रू. वासुदेव )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

अपर आयुक्त तथा सदस्य सचिव, विदर्भ विकास मंडळ, नागपूर.

**प्रत माहितीस्तव:**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२. महालेखापाल (१ व २), लेखा परीक्षा, मुंबई / नागपूर.
३. महालेखापाल (१ व २), लेखा व अनुज्ञेयता, मुंबई / नागपूर.
४. संचालक, यशदा, पुणे.
५. निवासी लेखाधिकारी, मुंबई/ नागपूर
६. निवड नस्ती, का. १४१६, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.